(5)

GR-20040719130408001-2500

**महिला आर्थिक विकास महामंडळ**
**माविम महिला प्रांगण (माविम घर योजना)**

**महाराष्ट्र शासन**
**क्रमांक- मआयो-२००२/प्र.क्र. ११५/ का- १०**
**महिला व बाल विकास विभाग,**
**नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.**
**दिनांक -१७ जानेवारी, २००४**

**वाचा :-** महिला व बाल विकास विभाग शासन निर्णय माविम-२००१/प्र.क्र.१०/का-१०, दि. २०.१.२००३.

**पार्श्वभूमी :-** महिला धोरण - २००१ खाली महाराष्ट्रातील महिला विकासाच्या योजना राबविण्याकरीता माविमला **"शिखर संस्था"** म्हणून घोषित करण्यात आले आहे. यास अनुसरुन महिला आर्थिक विकास महामंडळाने, महामंडळाचा विस्तार करुन महाराष्ट्रातील प्रत्येक जिल्हयात माविमचे जिल्हा कार्यालय स्थापन केले आहे. विविध विभागांमार्फत माविमकडे महिला विकासाच्या योजना सोपाविण्यात येत आहेत. स्वयंसहाय्यता बचत गटांची स्थापना, त्यांचे संघात व महासंघात रुपांतर करणे, महिलांना उद्योजकता व कौशल्यपर प्रशिक्षण देणे, सुडाअंतर्गत महिला प्रशिक्षण, महिलांच्या उत्पादित वस्तूंकरिता बाजारपेठ उपलब्ध करुन देणे, केंद्र शासन पुरस्कृत महिला विकासाच्या योजना राबविणे, महिला सक्षमीकरणासाठी जाणीव जागृती करणे, अनेक जबाबदा-या माविमवर सोपविण्यात आल्या असून आणखीही जबाबदा-या सोपविण्यात येत आहेत. अनेक योजनांखाली महिला प्रशिक्षणासाठी निधी उपलब्ध असतो. महिला स्वावलंबी करण्यासाठी आणि त्यांची आर्थिक क्षमता वाढविण्यासाठी त्यांना उद्योजकीय व कौशल्यपर प्रशिक्षण देणे आवश्यक झाले आहे. याकरिता प्रत्येक जिल्हयामध्ये निवासांची, प्रशिक्षण केंद्रांची सोय असणे नितांत गरजेचे झाले आहे. जागेअभावी, प्रशिक्षण कार्यक्रम सातत्याने पूर्ण वर्षभर आयोजित करणे शक्य होत नाही. महिलांना शेतीविषयक आणि बिगर शेतीविषयक क्षेत्रात प्रशिक्षीत केल्यास कृषि क्षेत्रासाठी प्रशिक्षित कामकरी महिला उपलब्ध होवू शकतील आणि अकृषि क्षेत्रात महिला स्वत:चा व्यवसाय निवडून अर्थार्जन करु शकतील. महिला विकासाच्या क्षेत्रात अग्रेसर असलेल्या आंध्रप्रदेश व तामिळनाडू राज्याचा अभ्यास केल्यानंतर असे निदर्शनास आले आहे की, आंध्र प्रदेशमध्ये मोठया प्रमाणावर **"महिला प्रांगणम्"**ही महिला प्रशिक्षणाची योजना राबविण्यात येत

Page

आहे. या योजनेत आंध्र प्रदेश शासनाने जिल्हयाच्या ठिकाणी २ ते ५ एकर जागा महिला विकास महामंडळास दिलेली आहे. त्या ठिकाणी महिला प्रशिक्षण संकूल उभारण्यात आलेले आहे. या प्रांगणात महिलांना शेतीविषयक आणि बिगर शेतीविषयक आणि कौशल्यपर प्रशिक्षण देण्यात येते. प्रशिक्षणाचा कालावधी तीन महिन्यापासून सहा महिने इतका असतो आणि ही प्रशिक्षण केंद्रे निवासी प्रशिक्षण केंद्रे आहेत. या प्रशिक्षण केंद्रात विविध योजनांखाली उपलब्ध निधीतून प्रशिक्षण देण्यात येते. याच धर्तीवर महाराष्ट्रात निवासी महिला प्रशिक्षण केंद्रे उभारण्याचे प्रस्तावित आहे.

**निर्णय : -** महाराष्ट्रातील प्रत्येक जिल्हयाच्या ठिकाणी महिला आर्थिक विकास महामंडळास **"माविम महिला प्रांगण"** योजना राबविण्याची परवानगी खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

१) या केंद्रासाठी महिला व बाल विकास विभागाला २ ते ५ एकर जागा किंवा इमारत प्रत्येक जिल्हयात उपलब्ध करुन द्यावयाची आहे.

२) या जागेवर महामंडळाने केलेल्या आराखडयानुसार केंद्राची उभारणी करावयाची आहे.

३) केंद्राचा ताबा महामंडळाकडे रहाणार आहे.

४) केंद्र उभारण्यासाठी महामंडळाने निधी उभारावयाचा आहे.

५) ही प्रशिक्षण केंद्रे स्वयंसेवी संस्थांना देण्याची मुभा आहे, मात्र अशा संस्थांची नियुक्ती शासनाने इतर योजनांसाठी विहित केलेल्या निकषानुसार आणि माविमने ठरविलेल्या निकषानुसार करण्यात यावी.

६) **"माविम महिला प्रांगण"** हे सार्वजनिक प्रयोजन ठरते. त्यामुळे या जमीनीपासून कोणताही वित्तीय लाभ घेतला जाणार नाही या अटीच्या अधीन राहून, महाराष्ट्र जमिन महसूल (सरकारी जमिनीची विल्हेवाट लावणे). नियम १९७१ मधील नियम ६ अन्वये जिल्हाधिका-यांना प्राप्त असलेल्या अधिकारानुसार **"माविम महिला प्रांगण"** केंद्रासाठी जागा उपलब्ध करुन देण्यात यावी.

७) हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या व महसूल विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र. अनुकमे २४५/१४३१, दि. ५.११.०३ व ५१७/ज.१, दि. २८.११.०३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**(चंद्रसेन तुरकर)**
**शासनाचे उपसचिव**

प्रति,
अ.मु.स., नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
प्रधान सचिव, (महसूल), महसुल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
प्रधान सचिव, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
प्रधान सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा) (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपुर.
व्यवस्थापकिय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ, बांद्रा (पूर्व), मुंबई - ४०० ०५१.
सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य महिला महिला आयोग, मुंबई.
आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पूणे.
आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवायोजना, नवी मुंबई.
सर्व जिल्हा व महिला बाल विकास विभाग अधिकारी.
सर्व जिल्हाधिकारी.
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी आधिकारी
मा. मंत्री, महिला व बाल विकास विभाग यांचे स्वीय सहाय्यक.
मा. राज्यमंत्री, महिला व बाल विकास विभाग यांचे स्वीय सहाय्यक.
निवड नस्ती, का- १०.